विभागीय आयुक्तांच्या अधिपत्याखालील सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) यांचे कार्यालयातील ६ स्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१२/आरक्षण-३,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: ७ मार्च, २०२५

**संदर्भ:-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-१०८५/२९८८/१६-ब, दि.१३.०८.१९८६
२) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-१०८८/१९१९/१६-ब, दि.११.०५.१९९०
३) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-१०९१/२०२४/प्र.क्र.२५२/१६-ब, दि.०८.११.१९९४
४) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-१०९१/२०२४/प्र.क्र.२५२/१६-ब, दि.२७.०३.१९९६
५) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-१३९४/२०२४/प्र.क्र.२५/१६-ब, दि.२४.११.२०००
६) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: अर्थसं-२००३/प्र.क्र.११५/०३/१६-ब, दि.१९.०७.२००४
७) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: बीसीसी-२००५/प्र.क्र.२/०५/१६-ब, दि.१६.०३.२००६
८) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.७७/१६-ब(ब), दि.२१.०६.२०२३
९) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१५२/१६-ब, दि.१८.०९.२०२३
१०) सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्रमांक:संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१६/आरक्षण-३, दि.२७.०९.२०२४
११) वित्त विभाग, शा. नि. क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

विभागीय आयुक्तांच्या अधिपत्याखालील सहायक आयुक्त (मावक) या कार्यालयातील पदांचा आढावा घेऊन मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने एकूण ३६ नियमित पदे व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या १२ मनुष्यबळ याप्रमाणे सुधारित आकृतीबंध या विभागाच्या दि.२१.०६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेला आहे. तसेच, मा.मुख्य सचिवांच्या उच्च स्तरीय सचिव समितीने दि.२९.०४.२०२२ च्या बैठकीत सुधारित आकृतीबंधामध्ये वाहन चालक व शिपाई संवर्ग मृत ठरविला असल्यामुळे त्या संवर्गात कार्यरत कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी अधिसंख्य पदे मंजूर करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार सर्व सहायक आयुक्त (मावक) कार्यालयाकरिता सुधारित आकृतीबंधानुसार दि.१८.०९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये स्थायी व अस्थायी पदांमध्ये वर्गीकरण करण्यात आले असून एकूण ४२ (नियमित मंजूर ३६ पदे + ६ अधिसंख्य पदे) पदांपैकी ३४ पदे स्थायी व ८ पदे (नियमित मंजूर २ पदे + ६ अधिसंख्य पदे) अस्थायी करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

उपरोक्त मंजूर पदांपैकी ६ अस्थायी पदांना या विभागाच्या दि.२७.०९.२०२४ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता, सदर ६ अस्थायी पदांची मुदत संपुष्टात आली असून सदर पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असल्याने सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराच्या अधिन राहून परिशिष्ट-१ येथे नमूद केल्यानुसार विभागीय आयुक्तांच्या अधिपत्याखालील सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) या कार्यालयातील ६ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर पदांच्या वेतन व भत्ते यांचा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र.ए-४, मुख्य लेखा शीर्ष “२०७० इतर प्रशासनिक सेवा, ८००-इतर खर्च, (००)(०६) विभागीय आयुक्तांची कार्यालये (मागासवर्ग कक्ष) (अनिवार्य) (२०७० ०५८६)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०७१५०६५३६४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK MAHADEO CHEMTE

Digitally signed by ASHOK MAHADEO CHEMTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=7cf579d564c1ecb1f9db8131315b3c1d75eb6e6fc9a4768960c6b38cc3519467, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9D329586BFDEB8758AC3DF2D5A4BFB2D41BEB6B6B6033B048F01BF21C4A28A7D, cn=ASHOK MAHADEO CHEMTE
Date: 2025.03.07 15:07:56 +05'30'

**( अ. म. चेमटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व सहाय्यक आयुक्त (मावक), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय
३. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. महालेखापाल १ / २ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५. महसूल व वन विभाग (शासन निर्णयातील पदाच्या आस्थापना विषयक बाबी हाताळणारी सर्व कार्यासने)
६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती
७. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन २५
८. वित्त विभाग, कार्यासन व्यय-४ व अर्थसंकल्प-१९
९. निवडनस्ती (आरक्षण-३)

शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१२/आरक्षण-३, दिनांक: ७ मार्च, २०२५ सोबतचे जोडपत्र

## परिशिष्ट-१

### विभागीय आयुक्तांच्या अधिपत्याखालील सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष) यांचे कार्यालयातील ६ अस्थायी पदांचा तपशील

(मुदतवाढ कालावधी- दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५)

| अ.क्र. | पदनाम | सहायक आयुक्त (मावक) | | | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | कोकण | पुणे | नाशिक | छ.संभाजी नगर | अमरावती | नागपूर | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |
| १ | लिपिक टंकलेखक | ० | ० | १ | ० | १ | ० | २ |
| २ | वाहन चालक | ० | ० | ० | ० | ० | १ | १ |
| ३ | शिपाई | ० | १ | १ | ० | १ | ० | ३ |
| | एकूण | ० | १ | २ | ० | २ | १ | ६ |

ASHOK MAHADEO CHEMTE

Digitally signed by ASHOK MAHADEO CHEMTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=7cf579d564c1ecb1f9db8131315b3c1d75eb6e6fc9a4768960c6b38cc3519467, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9D329586BFDEB8758AC3DF2D5A4BFB2D41BEB6B6B6033B048F01BF21C4A28A7D, cn=ASHOK MAHADEO CHEMTE
Date: 2025.03.07 15:08:27 +05'30'

( अ. म. चेमटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन